# ई-साहित्य प्रतिष्ठान



# धुळवड विशेषांक !..

# शिमगा !..



संपादक -

सुप्रिया (जोशी) जाधव. पुणे
रेणुका (रेपाळ) खटावकर. पुणे
सुधीर सुरेश मुळीक. मुंबई

अंक - ११

## नमस्कार वाचकहो !...



ई-साहित्य प्रतिष्ठान आयोजीत धुळवड
मोहत्सवानिमीत्त आपणास खास आमंत्रण !...

अहो विचार काय करताय सामिल व्हा !..
कुठे यायंच ?... पत्ता लिहून घ्या !...



देशी कोंबडी कट्टा,
१०१ गटार गल्ली, ईस्टाप नाका,
मु.पोस्ट - ई-साहित्य प्रतिष्ठान.

विशेष सुचना :- येताना फ़ुग्यांपासुन जपुन...
आणि शाकाहारी सज्जनहो... सावधान !...
अंड्यांचीही सोय आहे !!....



मग येणारं ना ?... आम्ही आपली वाट पाहू ...

निमंत्रक :- ईस्टाप गुत्ता आणि मंडळी !..



या मोहत्सवाची रंगत वाढावी म्हणून ..
उत्सवाआधीच आमच्यातर्फ़े ही खास मेजवानी !...

## धुळवड विशेषांक शिमगा !!...

## धुलिवंदना ...

मन रंगित रंगित झाले
तन संगित संगित झाले ..



गेल्या वर्षाची होळी
मी बाल्यच हरपुन बसले
या वर्षी तर मी बाई
मज स्वतःस विसरुन फ़सले
रंगात रंग विरघळले
तन संगित संगित झाले ..



पिचकारीच्या ओठांनी
तू उमललेस मन माझे
आवेग भावनां झाल्या
तू उधळताच कारंजे
मी कंच कोवळी भिजले
तन संगित संगित झाले ..



तुज हळद लावता कोणी
मन माझे खळबळ होते
लावीशी रंग दुसरीला
मन माझे हळहळ होते
होळीच्या आगीत जळले
तन संगित संगित झाले ..



भिजलेले आपण दोघे
रिझलेले रेशम धागे
गर्दीत धुळवडिच्या तू
मी मागत मागत मागे
जग भुरळ जादू झालेले
तन संगित संगित झाले ..



मन केवल रंगित झाले
तन कोमल संगित झाले
मन रंगित रंगित झाले
तन संगित संगित झाले ..



- स्वारंगी देव.



स्मार्ट मुलगा + स्मार्ट मुलगी = रोमान्स !
स्मार्ट मुलगा + ढ मुलगी = लफडं !
ढ मुलगा + स्मार्ट मुलगी = लग्न !
ढ मुलगा + ढ मुलगी = विवाहपूर्व संकट !

हम्म .. विचार करा नाहीतर ?
नाहीतर काय खरा नाय !..











## आता माझा काय खरा नाय ...

तुझ्या प्रेमात पड्लय
नको थय धडपडलय
गो चेडवा ह्या बरा नाय ...
आता माझा काय खरा नाय !...

तुका सांगतय आंब्याच्या पोना
माका येकट्याक असा नाय होना
तुझा माज्यार भरौसो जरा नाय ?
आता माझा काय खरा नाय ...

तुज्या बापसाक इचार तोच सांगतलो
पावशेर टाकान उभो झींगतलो
गावात तुझ्या सारखा दुसरा नाय !...
आता माझा काय खरा नाय ...

येतोबाक नवस लावलय
तरंगा जत्रेत नाचयलंय
देवाक काळजी माझि जरा नाय !..
आता माझा काय खरा नाय ...

- मकरंद सखाराम सावंत.

दारू मुळे आयुष्य उध्वस्त झालेल्या बेवड्याला
बियर च्या बाटल्यांचा खच दिसला ...



पहिली बाटली फोडून तो म्हणाला,
तुझ्यामुळे माझी बायको मला सोडून गेली...

दुसरी बाटली फोडून तो म्हणाला,
तुझ्यामुळे माझा जॉब गेला...



तिसरी बाटली फोडण्यासाठी उचलली
ती भरलेली होती, ती पिशवीत ठेवत तो
म्हणाला, तुझा काही दोष नाही, तू चल घरी...



अहो धुळवड म्हणजे सगळेच रंग
आणि अशा दिवशी बाटल्यांचे रंग तरी कसे सुटतील

होळीला कित्येक सभ्य मनं बेभानं होऊन
धडपडत असतात !...
बाटलीच बूच उघडलं की मनातलं गुज
बाहेर येत !..



नेमकं काय होत चला बघुया !...

## मन पाणी सोड्याचे ...

होळीला भलत्या रंगांनी खुलते
मदिरेच्या गंधात धुंद मोहरते ...
मन पाणी सोड्याचे... गूज बाटल्यांचे
का होते बेभान असे धडपडते !...



होळीच्या रंगांनी अंगात रान शिरते
चुरचुरत्या डोळ्यांनी पत्त्यात रात सरते ...
घुटमळते, धडपडते, पडते अडखळते का चढते
त्या  भरल्या गटारावर मन हे वेडे झुलते
मन तुडुंब होऊन चिखलातून हे फिरते
अरे कुणास चढते कुणास ना मानवते !...



मन पाणी सोड्याचे... गूज बाटल्यांचे
का होते बेभान असे धडपडते !...



मळमळते जळजळते तरी कुठे उतरते
कधी गहिऱ्या नाल्यांच्या डोहात पार बुडते ...
तळमळते गुदमरते वेडी इतकी कशी रे चढते
तरी मोहाच्या भांगेला या मन हे वेडे भुलते
ओकले जरी हे पोट कुठे पण भरते
वेड्या परी हे ग्लासा मागून पळते !...

मन पाणी सोड्याचे... गूज बाटल्यांचे
का होते बेभान असे धडपडते !...

- सुधीर मुळीक.





रजनीकांतच्या गर्लफ्रेंडने एकदा त्याला सांगितलं,
मला सतत अस वाटतं की कुणीतरी माझा
पाठलाग करतंय.

दुस-या दिवशी अचानक ती चित्कारली,
माय गॉड, माझी सावली कुठे गेली ? ...



-------------------------------------------- !!

रंगात दंग तो प्रेमरंग पाहण्या नजर भिरभिरते
लपवून हात झुकवून मान ही वाट कुणाची बघते
हे गोड गुलाबी माझे सारे तोडं रंगवून होई
होळी ही साजरी परीची होळी ही साजरी !...



भारतात मुलींचं प्रमाण हे सरासरी
१००० मुलांच्या प्रमाणत ८४२ एवढं आहे,

त्यामुळे मुली वाचवा,
वाघ नंतर पण वाचवता येईल,



बाईकवर पाठीमागे कोण हव ?
मुलगी कि वाघ ?...

नाहीतर ... आयूष्य बेरंग !...









## रंग ...

लाल पिवळा निळा हिरवा
सगळेच भासू लागले काळे
तू गेलीस सोडून अन
सा-या सणांना लागले टाळे !..

लागू लागली बघ कडू
ती आवडती पुरणपोळी
जळतोय मी एकटाच अन
समोर जळत्येय होळी !..

अंगात होतोय दाह
तरी न घाम गळतो
नजर रोखता तूजवर
बघ क्षणात अश्रू ढळतो !..

हाडांना करुनी सरपण
कंठही करतोय टाहो
आजही तिच आशा
तू माझ्याच अंतरी राहो !..



रंग रंग जाती विरुनी
सारेच होई पारवा
घे मज कवटाळूनी आता
प्रितीचा सुट्टूदे गारवा !..



थांब क्षणभर तिथेच
मी असाच बघ येतो
उधळ रंग तुझे अन
तुझ्या रंगात रंगूनी जातो !..

- श्रीयुत गंगाधर टिपरे.



ईनकम टॅक्स ऑफ़िसर हसत होता..

क्लार्क : काय झाल साहेब ?

ऑफिसर : मल्लिका शेरावत ची फाईल आहे..

क्लार्क : मग त्यात हसण्यासारख काय आहे?

ऑफिसर : कपडे तर घालत नाही आणि
लॉड्री बिल दाखवलय ८ लाखाच ..



## गमती-जमती ...



कट्टी-बट्टी खाऊची वाटी
हमरी-तुमरी लाट्टा-लाठी
धम्मक लाडू चापट पोळी
कधी शिमगा कधी होळी !...



अटक-मटक सर सकट
हाती येईल त्याला पटक
पोलीस दादा आला सटक
चिरी मिरीची त्याला चटक !...



ह्याचा नारा त्याची हाळी
कधी दंगली जाळा-पोळी
पोरा-सोरांना न आकळती
थोरांच्या थोर गमती-जमती !...

- स्वाती फडणीस.







बंड्या देवाजवळ तपस्या करत असतो.
एक दिवस देव प्रगट होतो,

देव : मी प्रसन्न झालोय वत्सा,
बोल तुला काय हवयं !...

बंड्या : हे देवा, मला असे वरदान दे की मला
काहीच करायला नको, सगळे काही
लोक करतील पण पैसे मात्र मला देतील !....

देव : अरे गाढवा सरळ सांग ना तुला
"सुलभ-शौचालय" पाहिजे आहे !!....

तथास्तु !!!.....



रजनीकांत एका मुलाबरोबर पत्ते खेळत होता.
रजनीकांतकडे तीन एक्के होते.
तरीही तो डाव हरला.. का ?
.
.
.

कारण त्या मुलाकडे तीन
रजनीकांत होते !!.











## धुंद कुंद तो मुकुंद ... (गजल)

धुंद कुंद तो मुकुंद रंग लावितो
गौर वर्ण राधिकेच अंग जाळितो ..

आज शाम, छेडणार जाणिता तिने
वाट तीच चालण्यास चित्त भाळितो ..

मेघशाम, रंग लाल, फेकतो कसा
राहतो मनात आणि स्पर्श टाळितो ..

रंगता तुझाच रंग चिंब सावळ्या
कोण रंग सांग तो मला खुणावितो ..

प्रेम रंग पाहिला तुझ्या मिठीत मी
आज कोणती उमंग खास दावितो ?

कृष्ण सावळा कसा कुणास शोधतो ?
सांग काय शाम तू मनात पाळितो ?

- रमेश ठोंबरे.

## आज वाटेतच रंग उधळतो टपोरी ...



आज वाटेतच रंग उधळतो टपोरी
बालिके, जरा जपून जा कॉलेजवरी ..

तो छचोर चित्तचोर वाट रोखतो
हात ओढूनी खुशाल चिट्ठी फेकतो
मस्ताऊन, माजून जाळे टाकतो
सांगतो अजूनही तुला खरोखरी ..



सांग कामांधास काय जाहले
त्यांनी छेडल्याविना कुणा न सोडले
ज्यास त्यास रंग ढंग संग लागली
एकटीच वाचशील काय तू पोरी ?



त्या तिथे असंग संग त्यात गुंगला
ट्पोर-ट्पोऱ्यासवे बेधूंद दंगला
तो पहा ढोल इज्जतीचा वाजला
हाय माजले फिरुन तेच टपोरी..

- सूर्यकांत डोळसे,पाटोदा (बीड)





## होळीच्या ओत्या ...

आला फागुन महिना, आला होळीचा ग सन
झाला रंगाचा आठव, गेलं आनंदून मन ..



होळी सजवा सजवा, सडा सारवण दारी
फांदी चिरगुट बांधा, काढा रांगोळी साजरी ..

होळी पेटली पेटली, तिला दाखवा निवध,
घडा वाईटाचा भरे, झाला 'होलिके'चा वध..

तिला निवध तो काय, गोड पुरणाचीपोळी,
एक भाजला नारळ, ओंबी गत्हाळी गत्हाळी..



आता जळेल गारवा, उन डोक्यावर येई,
आणा शित्या-शाप ओठी, पोट मोकळे ते होई ..

होळी पेटली पेटली, आला भैरवांचा टोळ
तमो गुण सारे जाळा, होळी दुर्गुणांचा काळ ..



- रमेश ठोंबरे

बायको: आपण कुठे चाललोय?

नवरा : लाँग ड्राइव्हवर!

बायको : (लाडात येऊन) मग आधी का नाही सांगितलात



नवरा : मला पण आत्ताच कळलं की, ब्रेक फेल झालेत!

हे .. हे .. हे ..

कॉलेजचा पहिला दिवस, कॉलेजच्या
कट्ट्यावरील काही टपोरी मुले
चिंगीला अडवतात.



पहीला मुलगा : काय ग तुजे नाव काय आहे?

चिंगी : मला सर्वजण ताई बोलतात.



दुसरा मुलगा : कमाल आहे !
काय योगा-योग आहे ..
मला सर्वजण भाऊजी बोलतात ...

हे .. हे .. हे ..

खरंय तुमच ताई ..
ही कार्टी नाही सुधरणांर ..

असाच एक पाटलाचा कार्टा बघा ...



## पाटलाचा कार्टा



होळीचा सण कसा सजलाय
अरे  पाटलाचा कार्टा  माजलाय

हसतोय काय नाचतोय काय
गोमूला नखरा दावतोय काय

अंगात सदरा शोभतोय  खरा
डोळ्याला गॉगल  दिसतोय बरा
खाली गेली  मुंडी जरा लाजलाय......



वाचाळ वाणी मिजास करतोय
टपोरी गाणी म्हणत  फिरतोय

लाईन मारत रस्त्यांनी चालतोय
मागे पुढे उगा घुटमळतोय
चार चौघात घोटाळा गाजलाय....



गोमू  ही भुलते लाजून हासते
पिळदार बाहू  पाहून फसते

खुळ्यासारखी गावात फिरते
चोरून सारखी  मागे मागे  पहाते
लफड्यात पाय तीने  गोवलाय

- मनिषा नाईक .



# राधिके, हाच खरा ग तुझा हरी ...



आज या फडात रंग उधळतो जरी
आज या फडात रंग उधळतो जरी
राधिके, हाच खरा ग तुझा हरी ॥धृ.॥



हा चटोर चित्तचोर नजर रोखतो
हात ओढूनी खुशाल अंग टेकतो
रंगवून, रंगूनी शराब टाकतो
सांगतो येउन पुन्हा परोपरी ॥१॥



आज पुन्हा यास बघा वेड लागले
भंग पाजल्याविना कुणा न सोडले
ज्यास त्यास भंग-भंग मध्ये ओढले
एकटीच बसशील काय तू घरी ॥२॥

त्या तिथे पलंग-रंग रास रंगला
बार बालिकासवे तो दंग दंगला
तो पहा कल्लोळ गल्लीत माजला
हाय वाजली फिरुन तीच तुतारी ॥३॥



- रमेश ठोंबरे.

बायकोच्या सततच्या बडबडीमुळे
चंदू जाम वैतागला होता.



चंदू : तू जर पाच मिनिटं गप्प बसलीस ना
तर मी तुला पाचशे रुपये देईन.

चंदूची बायको गप्प बसली.

जेमतेम दोन मिनिटांनंतर तिने चंदूला विचारलं,
'अहो, जरा घड्याळ बघा ना,
पाच मिनिटं झाली का ते ?'



हे .. हे.. हे ..

आत्महत्येचे दोन मार्ग
झटपट आत्महत्या :
एक मोठा दोर घ्या. गळ्यात अडकवा.
छताला लटका! .



रमतगमत आत्महत्या :
एक मंगळसूत्र घ्या.
ते एका मुलीच्या गळ्यात अडकवा!!...

पण त्या आधी इष्काचा रंग मात्र
अनुभवला पाहिजे !...
चला तर मग ...



## रंग इष्काचा ...



रंग इष्काचा कसा;
बैजवार सांगते बसा..
हिरत्या हिरत्या रंगाची पान जोड
कात, चुना, मुखवास तिखट गोड
गोविंद विडा जसा..
ज्वानीचा कैफ असा..!..



ऐटबाज शौकीन कसा;
मैफलीत ठेवतो ठसा..
घोळ घोळवून खायाची खोड
टाळीस त्याच्या न्हाई तोड
मर्दानी दमदार चावा जसा..
कलेजात बाण घुसला असा..!



डंख सापाचा भिनतो कसा;
रंग चढतो नजरेत त्या तसा..
मेख तिथंच जिथलं बाई कोड
मग कुठसं आडून राई घोडं
ओठ ओठाला पुसतो जसा..
रंग इष्काचा असतो कसा..?



- स्वाती फडणीस.

# ई-साहित्य प्रतिष्ठान



मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास **ईस्टाप** जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाण होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे. **ईस्टाप** अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करून त्यांनाही या आनंदयात्रेत सहभागी करून घ्यावे ही विनंती. असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव कराल ?.... मग नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.



## ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

साप्ताहिक अंक : नेटाक्षरी,
ऑडियो ई नियतकालीक अल्बम: स्वरनेटाक्षरी
मुलांसाठी : बालनेटाक्षरी



## प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तॊ आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-३क़, ई-शाळा, तॊ-मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गॊष्टी, मीरा(मराठी अनुवाद), ऒथंब, सावळया मुलीची गाणी, सईची वही

---


वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**

ईस्टापचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व सूचना, अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

**esahity@gmail.com**




---